# पेडगावचा शहाणा

## दख्खनचा सुभेदार बहादुरखां कोकलताश

'शोले' सिनेमातील अंगरेज जेलर शेखी मिरवतो नंतर फजिती पावतो. याची आठवण ताजी होते.










सध्याच्या भू सेना, नौसेना, वायुसेनेच्या तज्ज्ञ लष्करी अधिकाऱ्यांनी केलेली मांडणी

# पेडगाव किल्ला मोहिम


Shrigonda
श्रीगोंदा
Hiradgaon
हिरडगाव
Rahu
राहु
Mandavgan
Pharata
मांडवगण
फरत
Kashti
काष्टी
भीमा नदी
Yavat
यवत
Patas
पाटस
Kurkumbh
कुरकुंभ
Supe
सुपे
Mugal Forces मुगल दल
Maratha Forces मराठा दल
Horces looters घोडे पळवणारे
पेडगाव किल्ला

‘शिवाजी महाराजांचे’ सैनिक गाजावाजा करत आपल्या किल्ल्यावर चालून येताना त्यांचा पुरता पराभव करायची ऐती संधी साधून त्यांच्यावर बहादुरखान सैन्य घेऊन मागे धावला. मग पुढे काय झाले ... ?



सरसेनापती हंबीरराव मोहित्यांची वेधक घोडदळ

# ‘या शोधकार्याच्या मर्यादा’

- युद्धशास्त्रीय दृष्टीकोनातून आजकालच्या लष्करी अधिकाऱ्यांना आज्ञा मिळाली तर ते संशोधनात्मक स्वातंत्र्य घेऊन, ह्या सारख्या मोहिमा त्या काळातील मर्यादा लक्षात ठेऊन कशा नियोजित करून पार पाडतील या प्रमेयावर हे शोधकार्य आधारित आहे.
- भारतीय इतिहासात अनेक ठिकाणी ऐतिहासिक लढायांचा तपशील विश्वसनीय पुराव्यांच्या अभावी उपलब्ध नाही. अशा वेळी त्या लढायात सहभागी व्यक्तींच्या जीवनातील वर्तणूक, शौर्य, धैर्य, हिम्मत, लष्करी व्यवस्थापनाची कौशल्ये, उपलब्ध साधनसामुग्री, शस्त्रसंभार यांची जाणीव ठेवून या मोहिमा सादर केलेल्या आहेत.
- प्रत्यक्षात घटना अशाच घडल्या होत्या असा दावा नाही. समरांगण कसे काय घडले असावे अशी शक्यता दाखवण्याचा प्रयत्न आहे.

# पार्श्वभूमीचे आकलन

❖ १६७४ सालातील आपल्या राज्याभिषेकाच्या सोहळ्यात लढाईची वेळ टाळण्यासाठी महाराजांनी दक्षिणेतील मुगल सुभेदार बहादुर खानाला भरीला पाडले. औरंगजेबाशी तह करायचा प्रस्ताव त्याला पाठवला. मोगल सत्तेला १७ किल्ले परत करतो, संभाजी राजे यांना पुन्हा पंचहजारी मनसब द्यावी. मलाच दक्षिणचा सुभेदार नेमावा. वगैरे कलमे ऐदी बहादुर खानाला पसंत पडली. (विजापूरकरांच्या सत्तेला टक्कर देऊन तुमचा एक शत्रू मीच संपवून टाकतो. म्हणजे तुमचा प्रचंड सैन्य खर्च वाचेल. असा प्रस्तावाचा आशय होता.)




# राज्याभिषेक सोहळा

❖औरंगजेबाला अफगाणिस्तानातील पठाण टोळ्यांनी सतावले होते. तो स्वतः एप्रिल १६७४ पासून पेशावरपाशी ठाण मांडून होता. मुगल सत्ता केंद्र दूरच्या अंतरावर गेल्याने खलिते जाता येताचा बराच काळ घालवून महाराजांनी राज्याभिषेक सोहळ्यात लढाईचे विघ्न टाळले.

❖ पोर्तुगीजांना स्वपराक्रमाने धाकात ठेवले. इंग्रजांना व्यावसायिक सवलती देऊन सलोख्याचे तह केले. जंजिरा सिद्दीशी इंग्रजांना मध्यस्थ करून तह करायला भाग पाडले.

❖ राज्याभिषेक कार्यक्रम थाटात सुखरूप पार पडला.

# बदललेली परिस्थिती

- १६७५ सालापर्यंत राजकीय परिस्थिती बदलली होती. औरंगजेबाला पठाणांशी युद्ध अर्धवट टाकून दिल्लीत परतावे लागले.
- मुगलांच्या मान्यता करारावर स्वाक्षरी करायला महाराजांनी नकार दिला.
- म्हणून मुगलांनी संतापून विजापूरकरांशी हात मिळवणीची बोलणी सुरू केली.
- शिवाजी महाराजांच्या सैन्याने बऱ्हाणपुरापर्यंत चढाई करून बरीच मोठी संपत्ती मिळवली. सुरतेहून पुन्हा संपत्ती मिळवायची मोहिम आखली गेली.
- परंतु परतताना वाटेत भिल्ल अदिवासींचा उपद्रव होऊन लूट स्वराज्यात आणणे शक्य होणार नाही असे वाटून त्यांनी नाद सोडला.



# भारतीय आरमाराचे उज्वल भविष्य पाहणारे द्रष्टा - शिवाजी महाराज



- ❖राजापुरी समोर कांसा बेटावर पद्म दुर्ग बांधला गेला. नंतर सुवर्ण दुर्ग, सिंधुदुर्ग, खांदेरी दुर्ग बांधले गेले. जैतापूर बंदरात आरमार व गुराबा जहाज निर्मिती सुरू झाली.
- ❖विजापूर करांच्या हद्दीतील सागर किनाऱ्यावरील फोंडा, अकोला, कारवार ठाणी काबीज केली.

❖ गुराबा १५० ते ३०० टन वजनाची क्षमता असलेले मध्यभागी रुंद आणि टोकाला निमुळते होणारे जहाज असते. ह्यावर २-३ डोलकाठ्या असतात. एका वेळी १५०- २०० सैनिक आणि खलाशी ह्यातून प्रवास करू शकतात.

# अरबी समुद्रातील तटावरील दक्षता

Padmadurg Fort
पद्मदुर्ग किल्ला



पद्मदुर्ग

BAZARPETH
बाजारपेठ

Eakdara

राजापुरी

मुरुड जंजिरा

राजापुरी समोर कांसा बेटावर जंजिऱ्याला तोड म्हणून पद्मदुर्ग बांधला गेला.

Rajapuri

Murud-Janjira Fort

# पद्मदुर्ग तोडीस तोड बांधून जंजिऱ्याचे महत्व कमी केले...




पद्मदुर्गाचा माल आणि सैन्य उतरवायचा धक्का



सिद्द्यांनी बळकावलेला मुरुड जंजिरा

# विजापुरच्या अदिलशाहीतील सत्तास्पर्धा

- ❖ विजापूरच्या अदिलशाहचा वजीर दक्षिणी मुसलमान खवासखानाने आपली मुलगी बहादुर खानच्या मुलाला देऊन सलोखा वाढवला.
- ❖ विजापूर दरबारात उत्तरेतील पठाण आणि दुसऱ्या बाजूला दख्खनी मुसलमान व सिद्दी मुसलमान यांच्यात सत्ता स्पर्धा शिगेला पोहोचली.
- ❖ पठाण नेता बहलोलखानाला हे सहन न झाल्याने त्याने दख्खनी मुसलमान खवासखानाला मेजवानी निमित्ताने बोलावले आणि भोसकून ठार केले. (नोव्हेंबर १६७५.)
- ❖ शिवाजी महाराज सप्टेंबर १६७५ मधे फार आजारी पडले असल्याच्या त्या काळात बऱ्याच अफवा होत्या. समर्थ रामदास स्वामींनी औषध व्यवस्था करून महाराजांना बरे वाटल्यावर त्यांनी दक्षिण भारतातील दिग्विजयाची आखणी सुरू केली..

# पेडगावजवळच्या सध्याच्या धर्मवीर गडावरील मोहिम

- वरील पार्श्वभूमीवर साधारण जुलै १६७५ मधे पेडगावचे शहाणे ही घटना घडली. जादा स्मार्ट बनायची हाव फजितीला कारणीभूत बनते. जशी शोलेतल्या अंग्रेज जेलरची झाली.
- बहादूर गडाबाहेरच्या सदर बाजारात फिरणाऱ्या जासूसांना बातमी कळली की अरब व्यापाऱ्यांनी बहादूरखानाला उंची जातीचे घोडे विकले आहेत.
- याचा अर्थ किल्ल्याच्या मुख्य तिजोऱ्याच बराच माल असावा.
- वेगवेगळ्या किल्ल्यावरून सैन्याच्या तैनातीत अनेक तिजोऱ्यातून रयतेकडून करा पोटी एकत्र केलेली संपत्ती गडावर येते. भोई, हमाल यांच्याशी दोस्ती करून किती तिजोरीत माल जमा होतो? कुठे त्या लपवल्या असतात? पहारेकरी किती असतात ही बातमी काढली गेली.
- पूर्ण कोटात साधारण १ हजार ते १२ शे लोकांचा राबता असतो. प्रत्यक्षात ५शे सैन्य व बाकीचे कामगार, व्यापारी, जनावरांचे नोकर जनानखान्यातील चाकर असतात.

# गडाचा नकाशा बनला




- आलेल्या बातमीतून पेडगावच्या परिसरात ७ हजार सैनिक वेगवेगळ्या सरदारांच्या तंबूत किंवा घर घेऊन वस्ती करून असतात.
- पावसाळी ४ महिन्यानंतर मोहिमेसाठी इतर किल्लेदार व गावातील तरुणांना भरती करून सैन्य २० हजारावर जमा होते. जर मोहीम फार मोठी असेल तर कधीकधी ३० हजार होते.
- खबऱ्यांनी दिलेली माहिती आणि महाराजांचे बहादुर गडाबाहेरच्या वस्तीतील राहणारे हेजीबांनी पाठवलेली माहिती एकत्रित केली गेली. नकाशे बनवले गेले.

# मागील दरवाज्याकडील सेनाधिकाऱ्यांना दिलेल्या सूचना




❖ महाराजांनी मोहिमेची आखणी केली. आधीपासून त्या भागात राहणाऱ्यांनी भीमा नदी पात्र, किल्ला, प्रवेश दारे, बुरूज, बालेकिल्ला, शस्त्रागार, वगैरे चित्र काढून समजावले.

❖ किल्ल्याच्या मागील भागात मुख्य सेनेने कंपनी कमांडराचा इशारा झाला की नदीच्या पात्रातून घुसायचे. ३ कंपन्या म्हणजे ५ ते ६ शे जवान नव्याने खरेदी केलेल्या घोड्यांच्या तबेल्यावर धाड टाकून अरबी घोडे ताब्यात घेतील.

# अरबी घोडे आले कुठून? कसे?

❖ सर्व घोडे नदी पात्रातून परत येऊन कुठे ही न थांबता सासवड पठारावर भुलेश्वर इथे पाठवले जातील.

❖ अन्य तलवारधारी ५ कंपनी कमांडर आपल्या १ हजार जवानांडून घोडे सोडवून पळवणाऱ्या ३ कंपन्यांना सुरक्षा कवच देतील.

❖ अरबी घोडे मोकळे झाले की तिजोऱ्या फोडून त्यातील रोख पैशाच्या थैल्या हातोहात नदी पार उभ्या घोड्यावर लादून त्यांना यवतवरून - सासवड पठाराकडे पाठवायचे.




## अरबी घोडे

❖त्याचा वेग, तग धरण्याची क्षमता, सौंदर्य, बुद्धिमत्ता आणि सौम्यता यासाठी मोलाचे असतात. सध्या गाईंना कोंबून वाहतुक करतात तसे २ ते ३ वर्षांची शिंगरे अरबस्तानातून हबशी गुलामांबरोबर घोडबंदर, गोवा, राजापुरी वगैरे आणत.

❖नंतर स्थानिक बाजारात विकून अरब जहाजे इतर माल भरून परतत असत. नंतर अशी शिंगरे माणसाळवून भारी किंमतीला विकली जात.

# औरंगजेबासाठी असलेला प्रचंड महसूल आणि अरबी घोडे जप्त करण्याची योजना - 1

- 5 कंपन्या (1 कंपनी म्हणजे सुमारे 150 ते 200 सैनिक) धनुष्यबाण घेऊन किल्ल्याच्या आत चढाई करतील आणि गड काबीज करतील. दगडफेक करणारे गडाच्या आजूबाजूच्या व खंदकासमोरील वस्त्या जाळतील आणि गोठ्यातील जनावरांवर दगडफेक करतील. गोंधळात चुकूनही लहान मुले व महिलांवर हल्ला केला जाऊ नये.
- तोडफोड करणारे आलेले पाहून पहारेकरी कोटचे दरवाजे आतून बंद करतील. तिजोरीच्या चाव्या दूरच्या तलावात किंवा नदीत टाकतील. अशा स्थितीत तिजोरीत जमा असलेल्या रोख रकमेव्यतिरिक्त सोने, दागिने, मौल्यवान भेटवस्तू इत्यादी दारे, कुलूपे तोडून सोबत आणलेल्या घोड्यांवर चढवाव्यात आणि स्वारांचे तीन गट तयार करून, दौंड, पाटस, यवत भागात विखुरले जावे.

# स्वराज्याच्या वापरासाठी हडप केलेल्या संपत्तीची विल्हेवाट लावण्याची योजना - 2

- यवत गावाजवळ सैन्य भुलेश्वर येथे रात्री थांबेल, नंतर सर्व कंपनी कमांडर पुरंदर किल्ल्यावर जमतील.
- प्रत्येक कंपनी कमांडर त्याच्या दिलेल्या कामाच्या दरम्यान घडलेल्या घडामोडींचा अहवाल कमांडर-इन-चीफला सादर करतील.
- शिवाजी महाराजांना भेटल्यावर सेनापती अरबी घोडे आणि सरकारी तिजोरीतील मौल्यवान वस्तू, नाण्यांच्या थैल्या, महागड्या वस्तू, रेशमी कापड, कपडे, मौल्यवान दागिने, अलंकारिक शस्त्रास्त्रे सुपूर्द करतील..



# पळपुटेपणाची बतावणी

- वरील घटना घडून येण्यासाठी लावलेला सापळा.
- सर सेनापती हंबीर राव मोहिते यांच्या नेतृत्वाखाली घोडदळाच्या १० कंपन्या (२००० घोडे स्वार) श्री गोंदे (सध्याचे नाव) जवळच्या वावरात आदल्या रात्री एकत्र जमतील.
- दुसऱ्या दिवशी सूर्योदयापासून... (सध्याच्या घड्याळाच्या मोजणी प्रमाणे कार्यक्रम पत्रिका)
- बरोबर ८ वाजता पेडगाव खेड्यापाशी सरसेनापती हंबीररावांच्या मागे ४ कंपन्या रणवाद्य तुकड्या पुढे लावून आपापले घोडेस्वार घेऊन सज्ज राहायचे.
- कंपनी २ आणि ४ पुढच्या मार्गावरून पेडगाव किल्ल्यावर हल्ला करायला जातील.
- किल्ल्याच्या समोरच्या व्यापारी बाजाराला आणि वस्तीला  शिंगे, तुताऱ्या, ताशे वाजवून आपण हल्ला करायला येत आहोत असे भासवतील.
- घबराट निर्माण करण्यासाठी आवाज आणि धूमाकूळ घालायला सुरुवात करतील.






कंपनी २ कंपनी १ कंपनी ३ कंपनी ४

सरसेनापती
हंबीरराव मोहिते



बहादुर गडाची अभेद्य तटबंदी



भीमा नदी पात्र



पात्रापलिकडे दबा धरून बसलेले ७ हजार जवानांचे सैन्य

## हल्ल्याचे वेळापत्रक

सकाळी ६ वाजता - शंख फुंकून साधारण १० किमी दूर कंपनी कमांडर २,१,३,४,आपापले घोडदळ सरसेनापतींमागे शिस्तबद्ध उभे करतील.

सकाळी ७ - वाजल्यापासून तुताऱ्या आणि रणवाद्यांचा गजर करायची सुरवात.

सकाळी ८ - वाजता - कंपनी २ आणि ४ बहादुरगडाच्या तटावर हल्ला करतील.

सकाळी १० - वाजेपर्यंत मुगलसैन्य गोळा होऊन हल्ला करायला गडाबाहेर पडेल. तेंव्हा कंपनी २ आणि ४ आपले घोडदळ मागे फिरवून पळताना दिसले पाहिजेत.

सकाळी ११ - वाजेपर्यंत मुगल सेना थोडे थोडे करून कंपनी १ आणि ३ समोर येईल. तेंव्हा २ आणि ४ कंपन्या डाव्या आणि उजव्या दिशांना पळून जातील.

# बहादुर खानाकडून काय कारवाई अपेक्षित असेल?



सध्या अडगळीत पडलेला किल्ला मुगल सुभेदाराची राजधानी होता, तेंव्हा पेठा, जनावरे आणि सैन्य शिबिरामुळे गजबजलेला होता.

- ❖ जेंव्हा बुरुजांवरून सैन्य हालचाली मुळे किल्लेदार व सुभेदार बहादुर खानाला हल्ला झाला आहे तर काय करावे हे ठरवून तो आपल्या सैनिकांना तयार व्हायला आज्ञा करेल.
- ❖ सैन्य पहाटे उठून प्रात:विधी करून, थोडे खाऊन, घोड्यावर तयार होईल. किल्ल्याचा मुख्य दरवाजा उघडला की बाहेर जाऊन शत्रूशी लढायला सुसाट धावत निघतील. मधल्या वेळात मराठे आपले घोडदळ माघार घेऊन मागे हटतील.
- ❖ नजरेच्या टप्प्यात राहून मुगल सैन्याला आपल्या मागे पळते ठेवतील.



# प्रत्यक्षात कशी कायवाई घडली...



- नदीच्या पात्रात मागे लपलेले मुख्य सैन्य मागच्या सार्वजनिक कामाला जाण्यासाठी उघडलेल्या दरवाजातून आत प्रवेश केला. बहादुर खानाचा शोध घेतला गेला. सापडला तर मारून टाकायचे. पण तो घोडदळाचे नेतृत्व करत किल्ल्याबाहेर गेला होता.
- अगदी कमी संख्येच्या मराठ्यांच्या सैनिकांना मारून त्याचे श्रेय आपल्याला पदरात पाडून घ्यायची संधी म्हणून तो तातडीने पाठलागाच्या मोहिमेत मागेमार्गे होता.
- पसार केलेली अरबी शिंगरे, घोडे स्वार भुलेश्वर येथे सायंकाळी सूर्यास्ताच्या आधी जमा झाले.
- ११ ते 2 वाजेपर्यंत वेळ मिळाला त्यात १ कोटी रुपये किमतीच्या वेगवेगळ्या चलनाच्या गोण्या लूट करून यवत जवळ भुलेश्वरला परतल्या.
- पळून पळून हताश परतलेल्या घोडे स्वारांना किल्ल्याबाहेर बेचिराग बाजार, जनावरांचे तबेले मोकळे पडलेले रस्ते पहायचे कपाळी आले.
- बहादुरखानाच्या जनानखान्यातील बेगमांनी तिजोऱ्या कशा फोडल्या गेल्या, त्यातील नगदी थैल्या कशा लंपास केल्या वगैरे रडत सांगितले.
- किमती शोभेच्या तलवारी, खंजीर, सरोपे, पोषाख लुटले गेले.
- तबेलेवाले पळत येऊन सांगू लागले की आम्हाला तलवारीचा धाक दाखवून अरबी घोड्यांचे तबेले मोडून टाकले गेले. घोडे घाबरून पळत सुटले. गुलामांनी संधी मिळताच गावात पळू जायला सुरवात केली.
- या अल्ला...हम तो लुट गए बरबाद हो गए...

# फुकटची धावाधाव...

- डावीकडील १ आणि २ कंपन्या काष्टीवरून पारगावला मुळा-(मुठा) - भीमा नदी संगम पार करून ५० किमी यवतच्या डोंगराकडे पसार झाल्या. हताश होऊन मुगल सैनिक अर्ध्यावाटेतून गडाकडे परतले.






- कंपनी १ आणि ३ ने समोरून येणाऱ्या मुगलांच्या सैन्याला अडवून कंपनी २ आणि ४च्या सैन्याला दूर जायला उसंत दिला. नंतर ते ही पळून गेले.

- उजवीकडे पळणारे कंपनी ३ व ४ दल हिरडगाव, भावडी डोंगरात चढावर विखरून गेले. मुगलांना ते शोधता येईनात..

# खान-ए-जहां बहादूर जफर जंग कोकलताश

- ❖ औरंगजेबाचा तो दूध भाऊ होता. फेब्रुवारी १६७२ मध्ये  साल्हेरच्या लढाईत तो लष्करी सेनापती झाला. त्याने पेडगावला आपले मुख्यालय स्थापले.
- ❖ जुलै १६७५च्या सुमारास बुरहानपूरचा ७ हजारी सुभेदार झाला होता. १६८१ मधे बहादूरखान आपल्या पुतण्याच्या लग्नासाठी गेला असताना संभाजी महाराज तेव्हा नुकतेच राजे झाले होते. राज्याला आर्थिक  मिळायला त्यांनी सुरत लुटायची अफवा पसरवून काकर खानाला गाफिल ठेवला. बऱ्हानपुरवर हल्ला करून ते साफ लुटले.



बहादूर खान कोकलताशची लाहोर मधील कबर

# खान-ए-जहां बहादूर जफर जंग कोकलताश

- औरंगजेबाचा तो दूध भाऊ होता. फेब्रुवारी १६७२ मध्ये साल्हेरच्या लढाईत तो लष्करी सेनापती झाला. त्याने पेडगावला आपले मुख्यालय स्थापले.
- जुलै १६७५च्या सुमारास बुरहानपूरचा ७ हजारी सुभेदार झाला होता.
- १६८१ मधे बहादूरखान आपल्या पुतण्याच्या लग्नासाठी गेला असताना संभाजी महाराज तेव्हा नुकतेच राजे झाले होते. राज्याला आर्थिक मिळायला त्यांनी सुरत लुटायची अफवा पसरवून काकर खानाला गाफिल ठेवला. बऱ्हानपुरवर हल्ला करून ते साफ लुटले.
- औरंगजेबाने स्वतः दक्षिणेत यायला हे ही महत्वाचे कारण होते.
- १६८३ मध्ये मराठ्यांचा पराभव करून त्याने कल्याण ताब्यात घेतले.
- सहा वर्षांच्या रामशेज युद्धात शेवटी बहादूर खानने रामसेज येथे वेढा घातला. काळ्या जादूचा प्रयोग करूनही अपयश आले.
- औरंगजेबाने त्याची बुरहानपूर सुभेदारी म्हणून विसर्जित केले. कल्याणचा सुभेदार केले.
- १६९१ साली त्याला लाहोरच्या पाठवले गेले. लाहोरमध्ये तो वारला. (२३ नोव्हेंबर १६९७)



बहादूर खान कोकलताशची लाहोर मधील कबर



# सांगता



- या प्रसंगानंतर शिवाजी महाराजांनी दक्षिण कर्नाटक दिग्विजयाची तयारी सुरु केली.
- कुतुबशाह आणि वाटेतील अनेक संस्थानांना, मंदिरांना सदिच्छा भेट म्हणून तुकतुकीत चलाख अरबी घोडे, चलनी नाण्यांचे मानाचे थाळ मैत्री करार पत्रांवर सह्या शिके करायला जमलेल्या वकील आणि मध्यस्थांना, पुजाऱ्यांना पदाप्रमाणे मानपान करायला या मोहिमेतील रक्कम, पोषाख, भेटवस्तू आणि कोवळी अरबी अश्वशक्ती वापरली गेली.













सध्याच्या भू सेना, नौसेना, वायुसेनेच्या तज्ज्ञ लष्करी अधिकाऱ्यांनी केलेली मांडणी

